**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यार्थी वसतीगृह, नाशिक या इमारतीच्या बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वसेअ-२०१८/ प्र.क्र.१८७/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/ प्र.क्र.१६३/बांधकामे, दि.९/१०/२०१५
२) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - बैठक २०१६/प्र.क्र.४७६ /बांधकामे, दि.१४/३/२०१८
३) आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र .सकआ/मावक/ ऐति.स्थमारआंविवना/२०१८-१९/का/१२/३४५, दि. १२/४/२०१८ चे पत्र

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत दि. ९/१०/२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि. २४/१/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यार्थी वसतीगृह, नाशिक या इमारतीचे बांधकाम करण्याच्या कामास रू.४.९८ कोटी रकमेस मंजूरी देण्यात आली असून विभागाच्या दि. १४/३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त कामास रू. ४.९८ कोटीच्या मर्यादेत तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचेकडून दि.१२/४/२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या रू. ५.०० कोटी (अक्षरी रूपये पाच कोटी फक्त) इतक्या रकमेचा प्रस्तावाचे प्राप्त अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागास तांत्रिक छाननी साठी पाठविण्यात आले असता सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यार्थी वसतीगृह, नाशिक येथील मुलींच्या इमारतीचे बांधकामास रू. ४,२९,८५,८२४/- (अक्षरी रूपये चार कोटी एकोणतीस लक्ष पंच्याऐंशी हजार आठशे चोविस फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यार्थी वसतीगृह, नाशिक येथील मुलींच्या इमारतीचे बांधकामास रू. ४,२९,८५,८२४/- (अक्षरी रूपये चार कोटी एकोणतीस लक्ष पंच्याऐंशी हजार आठशे चोविस फक्त ) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

**अटी व शर्ती** :-

१) काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरू करावे.
२) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करून काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन करण्यात यावे.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा संदर्भ क्र.२ येथे नमूद दि.१४/३/२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ नुसार समन्वयक तथा कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून करावा.

३. मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यार्थीनी वसतीगृह, नाशिक या इमारतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| Name of the Department- Social Justice and Special Assistance Department | | | |
| Name of Work- Construction of Matoshri Ramabai Ambedkar Girls Hostel Building, Nashik | | | |
| RECAPITULATION SHEET | | | |
| Sr.No. | Particulars of Items | Norms (unit Rate Rs.per sqmt./Meter/LumpSum etc.) | Cost Rs. |
| **A** | **MAIN CIVIL WORK** | | |
| 1 | **Buiding proper (Scope)**<br>(a) Area (sqmt.) 366.87<br>(b) Number of floors GF<br>(a) Area (sqmt.) 328.50<br>(b) Number of floors FF<br>(a) Area (917.62 sqmt.per floor) 246.38<br>(b) Number of floors SF<br>**(d) Cost of Construction** | 27027 per. sqmt.<br>29730 per. sqmt<br>32703 per.sqmt. | 99,15,395<br>97,66,305<br>80,57,365<br>**2,77,39,066** |
| 2 | Electrification Internal<br>External | 5% of 1(d)<br>6% of 1(d)<br>**Total** | 13,86,953<br>16,64,344<br>30,51,297 |
| 3 | Water Supply and Sanitation | 8% - of 1(d) | 22,19,125 |
| 4 | Miscellaneous Items<br>Computerisation<br>Furniture 941.75 sqmt.<br>Rain Water Harvesting | <br>2% - of 1(d)<br>3000 per.sqmt.<br>Lump Sum<br>**Total** | <br>5,54,781<br>28,25,250<br>10,00,000<br>43,80,031 |
| | | **Total of 1 + 2 + 3 + 4 (T)** | **3,73,89,519** |
| | | **Add 4% for contingencies on (d)** | **11,09,562.63** |
| | | **Add 12% for GST on (T)** | **44,86,742.33** |
| | | **TOTAL COST OF PROJECT** | **4,29,85,824.37** |
| | | **Say Rs.lAKHS** | **429.86 Lakhs** |

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

४. यावरील खर्च हा मागणी क्र. एन-३, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९, अनुसूचित जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत -दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ डी८२३ या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा. यासाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११२७१७४२१०९८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.11.27 17:49:12 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
४. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. कार्यकारी अभियंता तथा समन्वयक, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
८. उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
९. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक.
१०. सहायक आयुक्त, समाजकल्याण, नाशिक.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक.